**राजमाता जिजाऊ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र अहमदनगर येथून जालना येथे स्थलांतरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१६/प्र.क्र.१३९/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ डिसेंबर, २०१६

वाचा :- (१) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.२३३/का-६, दिनांक १२ ऑगस्ट २०१४

(२) आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांचे पत्र क्रमांक एबाविसेयो/ का-५/ ३२९६/२०१५,दिनांक ३० नोव्हेंबर २०१५

**प्रस्तावना :-**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना या कार्यालयाकडून राबविण्यात येत आहे. अंगणवाडयांवर देखरेख ठेवण्यासाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या मुख्यसेविका / पर्यवेक्षिका यांना प्रशिक्षण देण्यासाठी महाराष्ट्र राज्यात मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र कार्यरत आहेत.

राजमाता जिजाऊ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र अहमदनगर येथे कार्यरत आहे. सदर प्रशिक्षण केंद्र जालना येथे स्थलांतरीत करण्याची विनंती संस्थेने केलेली आहे. प्रशिक्षण केंद्र जालना येथे स्थलांतरीत केल्यास मराठवाडयातील सर्व जिल्हे तसेच उत्तर महाराष्ट्रातील नाशिक विभागातील सर्व जिल्हयातील मुख्यसेविका/पर्यवेक्षिकांना जालना येथे प्रशिक्षण घेणे सोईचे होणार असल्याची शिफारस आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी शासनास केलेली आहे. त्यामुळे प्रशिक्षण केंद्र अहमदनगर येथून जालना येथे स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

अंगणवाडयांवर देखरेख ठेवण्यासाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या मुख्यसेविका /पर्यवेक्षिका यांना प्रशिक्षण देण्यासाठी सध्या अहमदनगर येथे कार्यरत असलेले राजमाता जिजाऊ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र अहमदनगर येथून जालना येथे कर्मवीर प्रतिष्ठाण या संस्थेच्या आवारात स्वतंत्र इमारतीमध्ये स्थलांतरीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जालना यांनी संस्थेने स्थलांतरीत नविन इमारतीमध्ये प्रशिक्षणार्थींना प्रशिक्षणाच्या ठिकाणी सर्व सोईसुविधा उपलब्ध करुन दिलेल्या आहेत किंवा

नाही तसेच शासनाने मान्यता दिल्यानुसार जालना येथे प्रशिक्षण केंद्र कार्यन्वीत केले किंवा नाही याबाबतचा अहवाल आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवायोजना,नवी मुंबई यांच्यामार्फत शासनास सादर करावा. तसेच १२ ऑगस्ट २०१४ च्या शासन निर्णयान्वये अंगणवाडी प्रशिक्षण केंद्रावर देखरेख व नियंत्रण ठेवण्यासाठी प्रत्येक जिल्हास्तरीय प्रशिक्षण केंद्रामध्ये समन्वय समिती नियुक्ती करण्याच्या सूचना देण्यात आलेल्या आहेत. सदर समन्वय समिती मार्फत अंगणवाडी प्रशिक्षण केंद्राच्या प्रशासकीय कारभाराचा तसेच आर्थिक बाबींचा आढावा घेण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१०२१३०६५७८२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind P Shenoy

Digitally signed by Milind P Shenoy
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Womens And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5a1cf9161e18ca8fa3b7a2263c18944e06f156ba19752cad5615c266d0b4ffb8, cn=Milind P Shenoy
Date: 2017.01.04 11:28:42 +05'30'

**( मि.प.शेणॉय )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
६. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. सचिव (महिला व बाल कल्याण विभाग), मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव ( ले व को.),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
११.आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
१२.सर्व विभागीय आयुक्त
१३.सर्व जिल्हाधिकारी
१४.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५.सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका

१६.सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
१७.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
१८. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
१९.सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२०.सर्व मंत्रालयीन विभाग
२१.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२२. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२३. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२४. अध्यक्ष , राजमाता जिजाऊ मध्यमस्तर प्रशिक्षण केंद्र अहमदनगर
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२८. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२९. निवड नस्ती (कार्यासन ६).